GR-20040410112539001-0100

सेवायोजन कार्यालय

शासनाच्या चतुर्थ श्रेणीतील निवृत्त कर्मचाऱ्यांच्या मुलास/अविवाहित मुलीस शासनाच्या सेवेत नोकरीसाठी सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची अट रद्द करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-आरटीआर-१०८०/८२९/१२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ एप्रिल, १९८१.

## परिपत्रक

सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-आरटीआर-१०६८/सी/१००९१ दिनांक २ डिसेंबर,१९६८ च्या शासन परिपत्रकानुसार तृतीय व चतुर्थ श्रेणीतील एक महिन्यापेक्षा अधिक कालावधीकरिता भरण्यात येणाऱ्या पदांवर सेवायोजन कार्यालयाने पुरस्कृत केलेल्या उमेदवारांतूनच नेमणूक करावी असे बंधन आहे. प्रस्तुत आदेश शिथिल करुन चतुर्थ श्रेणीतील निवृत्त कर्मचारी अथवा या श्रेणीतील एक वर्षाच्या कालावधीमध्ये निवृत्त होणारे कर्मचारी यांच्या मुलास/अविवाहित मुलीस शासन सेवेतील चतुर्थश्रेणी पदावरील नोकरीसाठी विशेष बाब म्हणून सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची अट खालील शर्तीवर रद्द करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

१) उमेदवारांनी चतुर्थ श्रेणीतील पदांकरिता विहित करण्यात आलेल्या सेवा प्रवेश नियमातील शैक्षणिक अर्हता, वय या अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे.

२) चतुर्थ श्रेणीतील निवृत्त किंवा एक वर्षाच्या कालावधीमध्ये निवृत्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या फक्त एका मुलास किंवा अविवाहित मुलीस फक्त चतुर्थ श्रेणीतील पदांवरील नेमणुकांकरिता सेवा योजन कार्यालयाच्या शिफारशीची अट रद्द करण्याची सवलत दिली जाईल.

३) सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशीची अट जरी रद्द करण्यात आली असली तरी अर्हताधारक उमेदवाराने अर्ज करण्यापूर्वी आपले नाव स्थानिक सेवायोजन कार्यालयामध्ये नोंदणी करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-
विशेष सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सचिव, लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
निबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
संचालक, सेवा योजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख, कार्यालय प्रमुख.